**जिल्हा व सत्र न्यायाधीश/ अतिरिक्त जिल्हा व सत्र न्यायाधीश, गडचिरोली यांना कार्यालय प्रमुख तसेच आहरणव संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक:एमसीटी १००४/१३८४/प्र.क्र.१६३/परि-५
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक: २८ सप्टेंबर, २००५

<u>वाचा:</u>- १) शासन अधिसूचना क्र.एमसीटी ०४९८/प्र.क्र.२३(ब) व (अ)/परि-५, दि.११.८.२०००.
२) जिल्हा व सत्र न्यायालय, गडचिरोली यांचे पत्र क्र.२२८१/२००४, दि.२२.९.०४ व दिनांक २४.८.२००५.

**<u>शासन निर्णय:</u>**- मोटार वाहन अधिनियम, १९८८ (१९८८ चा ५९) यांच्या कलम १६५(१) द्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन शासन अधिसूचना क्र.एमसीटी ०४९८/१३८४/प्र.क्र.१६३ (अ)/परि-५, दि.११.८.२००० पासून जिल्हा व सत्र न्यायाधीश, व अतिरिक्त जिल्हा व सत्र न्यायाधीश, गडचिरोली यांना मोटार अपघात दावा प्रकरणे हाताळण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. गडचिरोली जिल्हयाचे जिल्हा व सत्र न्यायाधीश/ अतिरिक्त जिल्हा व सत्र न्यायाधीश यांची पदसिध्द सदस्य म्हणून मोटार अपघात दावा न्यायाधिकरणावर नेमणूक करण्यात आली आहे. आता या आदेशान्वये सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, गडचिरोली यांना या न्यायाधिकरणाचे कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. सदर आदेश शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र १०००/प्र.क्र.४६/२००१/ विनियम, दि.११.७.२००१ मधील अ.क.३ वरील नियम क.२ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( आ. बा. डमाळे )
कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई (पत्रान्वये).
जिल्हा व सत्र न्यायाधीश, गडचिरोली, जिल्हा गडचिरोली.
अतिरिक्त/अपर जिल्हा न्यायाधीश व सत्र न्यायाधीश, तथा पदसिध्द सदस्य मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, गडचिरोली, जिल्हा गडचिरोली,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा)-१/२, मुंबई/नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली,
उप कोषागार अधिकारी, गडचिरोली
विधी व न्याय विभाग (एम शाखा), मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग, (विनियम/व्यय-८),
निवडनस्ती, परिवहन-५

61/D:/KOKANI/ACOT/005